**छत्रपती शिवाजी महाराज चषक राज्यस्तरीय कबड्डी स्पर्धा आयोजनासाठी निधी वितरित करण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:क्रीस्पर्धा-३२२२/प्र.क्र.१८२/क्रीयुसे-२,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक ३१.०३.२०२३

वाचा -:

१. शासन निर्णय क्रमांक: क्रीस्पर्धा-३२२२/प्र.क्र.१८२२-क्रीयुसे/ दि ०२.२०२३.१०.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.क्रीस्पर्धा- ११२१/प्र.क्र.३०/क्रीयुसे-,२दि.१५.०२.२०२३
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक पुनर्वि-२८२२/प्र.क्र. ५८ /अर्थसंकल्प, दिनांक ३१.३.२०२३

**<u>प्रस्तावना -:</u>**

सन २०२२-२३ या वर्षामध्ये छत्रपती शिवाजी महाराज चषक राज्यस्तर कबड्डी स्पर्धेचे स्पर्धेचे आयोजन करण्याकरीता रु. ५०.०० लक्ष (रुपये पन्नास लाख फ़क्त ) इतका निधी वितरित करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि. १०.०२.२०२३ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर स्पर्धा आयोजनासाठीची अनुदान रक्कम २०१२ मध्ये ठरविली असून स्पर्धा आयोजनासंबंधातील विविध बाबींवरील खर्चात होणाऱ्या वाढ विचारात घेता या स्पर्धेच्या अनुदानात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता शासनाने याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे. छत्रपती शिवाजी महाराज चषक राज्यस्तर कबड्डी स्पर्धेच्या आयोजनासाठी देण्यात येणाऱ्या सध्याच्या प्रतिवर्ष रु. ५०.०० लक्ष या अनुदानामध्ये वाढ करुन ते प्रतिवर्ष रु.७५.०० लक्ष एवढे करण्यास संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. मागणी क्र.ई ३ जिल्हा क्रीडा संकुलाचे परिरक्षण (कार्यक्रम ) ३१ सहायक अनुदाने ( वेतनेतर) २२०४ -५३१२ या लेखाशिर्षामधून पुनर्विनियोजनाने उपलब्ध झालेल्या रू. ९०.०० लक्ष निधीमधून रू. २२.५० लक्ष आणि मुळ अर्थसंकल्पीय तरतुदीमधील शिल्लक निधी रू. २.५० लक्ष असा एकूण रू. २५.०० लक्ष निधी छत्रपती शिवाजी महाराज चषक राज्यस्तर कबड्डी आयोजनासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय -:</u>**

सन २०२२-२३ या वर्षामध्ये छत्रपती शिवाजी महाराज चषक कबड्डी स्पर्धेचे आयोजन करण्याकरीता रु २५.०० लक्ष (रुपये पंचवीस लाख फ़क्त ) इतका निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२.	या संदर्भात होणारा खर्च "मागणी क्र.ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (३१) कबड्डी चषक (३१) (०१) छत्रपती शिवाजी महाराज चषक राज्यस्तरीय कबड्डी क्रीडा स्पर्धा (२२०४-२०४६) ३१ सहायक अनुदाने वेतनेतर" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मधील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I.	उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवू नये.

II.	राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३.	सदर योजनेअंतर्गत खेळाडूंना मानधन मंजूर करतांना संदर्भाधीन शासन निर्णयामधील अटी व शर्ती लागू राहतील.

४.	शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी . लेखाधिकारी/ जिल्हा क्रीडा अधिकारी/यासाठी संबंधीत उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५.	सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौसं ३९१/२०२३/व्यय-५ दि. २९.०३.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३१२०३२५८६४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAMDAS GANPAT DHUMAL

Digitally signed by RAMDAS GANPAT DHUMAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=3246a8286e67ae7423b98bfd800865585eb8601521f097ab07142d65ea9b2b15, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=24F4ACDDCFF993441F6C634862546E9D122E0DB556806B179B794879ACF360F5, cn=RAMDAS GANPAT DHUMAL
Date: 2023.03.31 21:25:16 +05'30'

**( रामदास धुमाळ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
४. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन , मुंबई
५. मा. सभापती / उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन , मुंबई

६.मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
.७ मायांचे स्वीय सहायक (विधानपरिषद / विधानसभा) विरोधी पक्षनेता., मुंबई.
.८सर्व विधानसभा .विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक /
९. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१०. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१२. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत )
१५. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१६. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत )
१७. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१८.वित्त विभाग व्यय -५ /अर्थ -८,नियोजन विभाग (का. १४७१ ) मंत्रालय मुंबई,
१९. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. निवड नस्ती (क्रीयुसे-२).